**अखिल भारतीय सेवेतील अधिका-यांना लागू असलेल्या परिभाषित निवृत्तीवेतन योजना/राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजनेअंतर्गत शासनाच्या अंशदानात वाढ करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- भाप्रसे-२५१९/प्र.क्र.२९६/२०१९/९,**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक :- ०३.०९.२०२०

**वाचा:** १) शासन अधिसूचना, केंद्र शासन, वित्त मंत्रालय, आर्थिक कार्य विभाग, नवी दिल्ली दि.२२.१२.२००३
२) या विभागाचा शासन निर्णय क्र.भाप्रसे २५०६/प्र.क्र.३६०/०६/९ दि.१५.०२.२०१३
३) केंद्र शासनाची अधिसूचना क्र. फा.सं. १/३/२०१६-पीआर, दि. ३१.१.२०१९

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाने संदर्भाधीन क्र.१ च्या अधिसूचनेन्वये दिनांक १.१.२००४ रोजी व त्यानंतर केंद्र शासनाच्या सेवेत नियुक्त होणा-या अधिका-यांना परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना/राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजना लागू करण्यात आली आहे. सदर योजनेमध्ये स्तर १ अंतर्गत संबंधित अधिका-यास मूळ वेतन अधिक महागाई वेतन ( असल्यास ) अधिक महागाई भत्ता अशा एकूण रकमेच्या १० % इतकी रक्कम दरमहा वेतनातून मासिक अंशदान द्यावे लागेल. राज्य शासन सममूल्य अंशदान देईल अशी तरतूद आहे.

२. केंद्र शासनाच्या संदर्भ क्र.३ च्या अधिसूचनेन्वये केंद्रीय सेवेतील अधिकारी/कर्मचारी यांच्या बाबतीत नियोक्त्याचे अंशदान वर्गणीदार कर्मचा-याच्या वेतन व महागाई भत्त्याच्या १४ % करण्यात आले आहे.

३. केंद्र शासनाच्या वरील निर्णयाच्या धर्तीवर अ.भा.से. सेवेतील अधिका-यांना राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजनेअंतर्गत प्रदान करण्यात येणा-या नियोक्त्याच्या अंशदानामध्ये वाढ करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

दिनांक १.१.२००४ रोजी व त्यानंतर सेवेमध्ये नियुक्त झालेल्या परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना/राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजना लागू असलेल्या महाराष्ट्र राज्य संवर्गातील अखिल भारतीय सेवेतील अधिका-यांच्या बाबतीत अधिका-यांचे अंशदान म्हणून वर्गणीदाराचे मूळ वेतन अधिक महागाई भत्ता या रकमेच्या १०% इतके मासिक अंशदान कपात केले जाईल. सदर खात्यामध्ये यापुढे नियोक्त्याचे अंशदान म्हणून वर्गणीदाराचे मूळ वेतन अधिक महागाई भत्ता या रकमेच्या १४% इतके मासिक अंशदान संबंधित कार्यालय देईल.

२. शासनाच्या अंशदानामध्ये करण्यात आलेली वाढ दि. १ एप्रिल २०१९ पासून लागू करण्यात येत आहे. माहे एप्रिल २०१९ ते ऑगस्ट २०२० च्या थकबाकी रकमेसह माहे सप्टेंबर २०२० च्या ऑक्टोबर २०२० मध्ये देय वेतन देयकाद्वारे वाढीव शासन अंशदान कपातीची कार्यवाही करण्यात यावी .

३. यासंबंधीचा खर्च शासनाचे अंशदान ज्या लेखाशीर्षाखाली टाकण्यात येतो त्या शीर्षाखाली टाकण्यात यावा व तो त्या-त्या शीर्षांतर्गत मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

४. हे आदेश वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक १७/२०/सेवा-४, दिनांक १२.०२.२०२० अन्वये मिळालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक क्र. २०२००९०३१५४२४६१५०७ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sarita Rishi Bandekar Deshmukh

Digitally signed by Sarita Rishi Bandekar Deshmukh
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5140223e17381bc47a67b9fede8dda33c03e3e9ce591f826d8193080c68a08b8, serialNumber=e40a063b6b4e8f59f91f350aa6fec292a55db5bf8829c64d6c44e00a701cdaac, cn=Sarita Rishi Bandekar Deshmukh
Date: 2020.09.03 15:43:42 +05'30'

**(स.रि.बांदेकर-देशमुख)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे सचिव,
३. सर्व मा. मंत्री/ राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
४. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य,
५. सर्व मंत्रालयीन विभागांचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव
६. सर्व मंत्रालयीन विभाग,
७. महालेखापाल , महाराष्ट्र -१ (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र ,मुंबई
८. महालेखापाल , महाराष्ट्र -१ (लेखा परीक्षा) महाराष्ट्र , मुंबई,
९. महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र , नागपूर,
१०. महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा परीक्षा) महाराष्ट्र, नागपूर,
११. संचालक लेखा व कोषागारे, मुंबई
१२. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय ग्रंथालय सहावा मजला, विधान भवन,मुंबई,
१३. अधिदान व लेखा अधिकारी ,मुंबई,
१४. निवासी लेखा परीक्षा अधिकारी , मुंबई,
१५. सर्व विभागीय आयुक्त,
१६. सर्व जिल्हाधिकारी,
१७. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी ,

१८.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
१९.वित्त विभाग/सेवा-९, सेवा-५, व्यय-४, अर्थ-२५ व कोषागार-१, मंत्रालय, मुंबई,
२०.गृह विभाग/पोल-१, मंत्रालय, मुंबई
२१.महसूल व वन विभाग / फ-४, मंत्रालय, मुंबई
२२.पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, पोलीस मुख्यालय, मुंबई.
२३.प्रधान मुख्य वनसंरक्षक ,महाराष्ट्र राज्य, नागपूर
२४.महाराष्ट्र राज्य संवर्गातील सर्व भारतीय प्रशासन सेवेतील अधिकारी,
२५.महाराष्ट्र शासनाच्या अधिपत्याखालील सर्व सांविधानिक व सार्वजनिक उपक्रम,
२६.सचिव, कार्मिक व प्रशिक्षण प्रशासकीय सुधार व लोकतक्रारी आणि पेंशन मंत्रालय, नवी दिल्ली.
२७.सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
२८. सर्व मंत्रालयीन विभागांच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
२९. निवड नस्ती